**एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम १ (सीपीटीपी -१) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी, गट-अ यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक - टिआरएन-०८२१ /प्र.क्र.१६ /सीपीटीपी-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ०४/१०/२०२१

<u>वाचा</u> :- १.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१८-ब, दि.२०/०१/२०१४
२.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-०५१४/ प्र.क्र.१०/ १८-ब (२), दि.२७/०६/२०१४
३.सा. प्र. वि., कार्यालयीन आदेश क्र.टिआरएन०७१५/प्र.क्र.१००/१५/१८-ब(१), दि.३१/०७/२०१५.
४.सा.प्र.वि.,शासन निर्णय, क्र. परिवी-२७१५ /प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९/०२/२०१६

**शासन आदेश**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१३ अन्वये शिफारस झालेल्या व दिनांक २७/०६/२०१४ च्या कार्यालयीन आदेशान्वये उपमुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी (गट- अ) या पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१ (सीपीटीपी-१ (२०१४) दिनांक ०९/०६/२०१४ ते दिनांक ३०/०६/२०१६ या कालावधीत पूर्ण झाला असून सदर प्रशिक्षण खालील विवरणपत्रातील उमेदवारानी समाधानकारकरित्या पूर्ण केले आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २९ फेब्रुवारी,२०१६ मधील तरतूद क्रमांक १ (३) (ब) नुसार परिविक्षा कालावधीत नैमित्तीक रजेव्यतिरिक्त कोणत्याही स्वरूपाची रजा उपभोगल्यास उमेदवारांचा परिविक्षा कालावधी रजेच्या कालावधीएवढा वाढविण्यात येतो.तसेच सदर शासन निर्णयामध्ये परिविक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त १ वर्षापर्यंत वाढविण्याची तरतूद आहे. तथापि, श्रीमती पाटील या प्रशिक्षण समाप्तीनंतर प्रसुती रजेवर राहिल्या असून त्यांनी प्रसुती रजेनंतर जुळया अपत्यांचे संगोपन व स्वत:चे आजारपणाच्या कारणास्तव दिनांक ११/०८/२०१६ ते दिनांक ०२/०८/२०१८ या कालावधीतीत सलग रजा मंजूर करण्यात आली आहे. त्यामुळे परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करताना श्रीमती पाटील यांच्या प्रशिक्षणादरम्यानच्या ५६ दिवसांच्या रजा या प्रशिक्षण समाप्ती पासून रजेवर जाईपर्यंतचे ४१ दिवस (१ जुलै, २०१६ ते १० ऑगस्ट,२०१६ ) व दिर्घकालीन रजेवरुन रुजू झाल्यानंतर म्हणजेच दिनांक ३ ऑगस्ट,२०१८ पासून १५ दिवस पुढे या प्रमाणे परिगणना करुन त्यांचा परिवीक्षा कालावधी समाप्त करणे आवश्यक आहे.श्रीमती पाटील यांची सदर दिर्घकालीन रजा ही अपरिहार्य कारणास्तव झाली आहे. हे विचारात घेता, सदर प्रकरणी **एक विशेष बाब** म्हणून श्रीमती शुभांगी पाटील यांचा परिविक्षा कालावधी **दिनांक १७ ऑगस्ट, २०१८ रोजी (म.नं.**) समाप्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. त्यानुसार श्रीमती शुभांगी पाटील यांचा स्तंभ क्र. ५ मध्ये नमूद रजा कालावधीएवढा परिविक्षा कालावधी वाढविण्यात येत असून स्तंभ क्र. ७ मध्ये नमूद केलेल्या दिनांकास परिविक्षा कालावधी समाप्त करण्यात येत आहे.

**परिवीक्षा (प्रशिक्षण) कालावधी दिनांक ०९/०६/२०१४ ते ३०/०६/२०१६**

| अ. क्र. | नाव | शिफारस प्रवर्ग | परिविक्षाधीन म्हणून सेवेत नियुक्तीचा दिनांक | परिविक्षाधीन उमेदवाराने उपभोगलेल्या रजा (दिवस) | विभागीय परीक्षा उत्तीर्ण / परीक्षेचा कालावधी | परिविक्षा कालावधी समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्रीमती शुभांगी तानाजी पाटील | OPEN-FEMALE | ०९/०६/२०१४ (म.पू.) | ५६ दिवस (प्रशिक्षणादरम्यान ) १८० दिवस प्रसुती रजा व पुढे सलग ५४२ दिवस रजा (प्रशिक्षणानंतर) | प्रथम संधीत उत्तीर्ण | १७/०८/२०१८ (म.नं.) |

४. शासन निर्णय, दि. २९/०२/२०१६ मधील परिच्छेद १ (८) मध्ये पुढील तरतूद आहे : "परिविक्षा अधिकारी यांस पहिली वेतनवाढ, त्यांचा एक वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यावर देण्यात यावी व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी". त्यानुसार श्रीमती पाटील यांना पहिली वेतनवाढ दिनांक ३१/०७/२०१५ च्या कार्यालयीन आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली आहे. आता त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने त्यानंतरची वेतनवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर आदेश शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत. त्याचा संकेतांक २०२११००४१२१९४६१६०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gupte Sanju Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59, serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2021.10.04 15:44:32 +05'30'

**( संजू गुप्ते )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति**

श्रीमती -शुभांगी तानाजी पाटील, उपमुख्य कार्यकारी अधिकारी तथा गट विकास अधिकारी (गट अ) (ईमेलद्वारे)

**प्रत,**

१. सह सचिव/ उप सचिव, (आस्था-३, उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी गट-अ ), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, कोल्हापूर
४. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
५. निवडनस्ती.